राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अंशत:/पूर्णत: अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांसाठी शिक्षकेतर कर्मचा-यांसाठी सुधारित आकृतीबंध लागू करणे.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसएन-२०१५/प्र.क्र.१२/टीएनटी-२**
*मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,*
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २८ जानेवारी, २०१९

**संदर्भ** :- १) माध्यमिक शाळा संहितेतील शिक्षकेतर कर्मचा-यांचे निकष.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक : एसएसएन-२६९४/ १७९०/ (१६४)/माशि-२, दिनांक २८ जून, १९९४
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक : एसएसएन-६०३/ (४१/०३)/माशि-२, दिनांक २५ नोव्हेंबर, २००५
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक : एसएसएन-२०१५/ प्र.क्र.१२/टीएनटी-२, दिनांक २३ ऑक्टोबर, २०१३
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/ सं.क्र.१०/१५/टीएनटी-२, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५
६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक : एसएसएन-२०१५/ प्र.क्र.१२/टीएनटी-२, दिनांक १८ मे, २०१५

**प्रस्तावना :-**

राज्यामधील खाजगी अनुदानित शाळांमधील शिक्षकेतर कर्मचा-यांच्याबाबत निकष संदर्भाधीन क्र.१ येथील माध्यमिक शाळा संहितेमध्ये संकलित स्वरुपात विहीत करण्यात आलेले आहेत. या निकषामध्ये संदर्भाधीन क्र.२, ३ व ४ येथील शासन निर्णयांन्वये वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबंधास संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये शासनाने स्थगिती दिलेली असून सदर संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये शिक्षकेतर कर्मचा-यांची पदे निश्चित करण्यासाठी आयुक्त, शिक्षण यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठित करण्यात आली. त्यामध्ये लोकप्रतिनिधी व विविध संघटनांचे प्रतिनिधी यांचा समावेश करण्यात आला आहे. उक्त समितीने दिनांक ३१ जुलै, २०१५ रोजी आपला अहवाल सादर केला असून त्यांच्या शिफारशी समितीने सदर अहवालात सुचविलेल्या आहेत. आयुक्त समितीच्या शिफारशी व यापूर्वी गठित करण्यात आलेल्या चिपळूणकर समिती, गोगटे समिती व संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२३ ऑक्टोबर, २०१३ च्या शासन निर्णयानुसार तत्कालीन उच्चस्तरीय सचिव समितीने ठरवून दिलेली पदे यांचा विचार करुन शिक्षकेतर पदांचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय समितीच्या विचारार्थ सादर करण्यात आला होता. उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने उच्चस्तरीय समितीने शिक्षकेतर पदाचा आकृतीबंध निश्चित करण्याचा निर्णय दि.१३ नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या बैठकीमध्ये घेतला. त्याअनुषंगाने राज्यातील सर्व खाजगी

अनुदानित/अंशत: अनुदानित माध्यमिक/उच्च माध्यमिक शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांसाठी आकृतीबंध निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व खाजगी अनुदानित/अंशत: अनुदानित माध्यमिक/उच्च माध्यमिक शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांसाठी आकृतीबंध निश्चित करण्यासंदर्भातील यापूर्वीचे सर्व शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून खालीलप्रमाणे सुधारित आकृतीबंध लागू करण्यात येत आहे:-

(१) लिपिकवर्गीय पदे :-

| अ.क्र. | विद्यार्थी संख्या (५वी ते १२वी ची पटसंख्या) | कनिष्ठ लिपिक | वरिष्ठ लिपिक | मुख्य लिपिक |
|---|---|---|---|---|
| १ | ५०० पर्यंत | १ | ० | ० |
| २ | ५०१ ते १००० पर्यंत | १ | १ | ० |
| ३ | १००१ ते १६०० पर्यंत | २ | १ | ० |
| ४ | १६०१ ते २२०० पर्यंत | २ | १ | १ |
| ५ | २२०१ ते २८०० पर्यंत | ३ | १ | १ |
| ६ | २८०० पेक्षा जास्त व पुढील प्रत्येक ६०० विद्यार्थ्यांमागे | अ.क्र.५ पेक्षा १ अतिरिक्त कनिष्ठ लिपिक | | |
| | एकूण पदे | १७६९५ | ४९१२ | ९२६ |

(२) अधीक्षक :-

| अ.क्र. | पदाचे नांव | मंजूर पदे |
|---|---|---|
| १ | अधीक्षक | अधिक्षक पदावर कार्यरत १९कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर सदरची पदे व्यपगत होतील. सदरचा संवर्ग मृत संवर्ग झाल्यामुळे नवीन पदभरती अथवा नवीन पदनिर्मिती करण्यात येऊ नये. |

(३) ग्रंथपाल :-

| अ.क्र. | पदाचे नांव | विद्यार्थी संख्या (इयत्ता ६ वी ते १२ वी ची पटसंख्या) | मंजूर पद | एकूण मंजूर पदे |
|---|---|---|---|---|
| १ | पूर्णवेळ ग्रंथपाल | १००१ पेक्षा जास्त | १ | २११८ |
| २ | अर्धवेळ ग्रंथपाल | अर्धवेळ ग्रंथपाल पदावर सध्या कार्यरत १६०० कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर सदरची पदे व्यपगत होतील. यापुढे अर्धवेळ ग्रंथपाल पदाचा संवर्ग मृत संवर्ग होत असल्याने नवीन पदभरती अथवा पदनिर्मिती करण्यात येऊ नये. | | |

(४) प्रयोगशाळा सहाय्यक :-

| अ.क्र. | पदाचे नांव | विद्यार्थी संख्या | मंजूर पदे | एकूण मंजूर पदे |
|---|---|---|---|---|
| १ | प्रयोगशाळा सहाय्यक | (अ) इयत्ता ९वी व १०वी | | |
| | | (१) २०१ ते ७०० | १ | ४०४८ |
| | | (२) ७०१ ते १५०० | १ | ६१० |
| | | (३) १५०० पेक्षा जास्त | १ | २७ |
| | | (ब) उच्च माध्यमिक शास्त्र शाखा | | |
| | | भौतिक/रसायनशास्त्र | १ अतिरिक्त | १०२० |
| | | जीवशास्त्र | १ अतिरिक्त | १०२० (जीवशास्त्रासाठी फक्त) |

(५) चतुर्थश्रेणी कर्मचारी : -

चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या पदांसंदर्भातील आकृतीबंधाबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

३. वरील निकषानुसार अतिरिक्त होणारी शिक्षकेतर कर्मचा-यांची पदे त्याच संस्थेत सदरचे कर्मचारी त्या पदावर सेवानिवृत्त होईपर्यंत कार्यरत राहतील, अथवा अतिरिक्त कर्मचा-यांच्या सेवा नजिकच्या शासकीय/जिल्हा परिषद कार्यालयांत/अनुदानित/अंशत: अनुदानित संस्थांमध्ये आवश्यकतेनुसार तात्पुरत्या प्रत्यावर्तित करण्यात येतील. सदर कर्मचा-यांच्या सेवानिवृत्तीनंतर ही अतिरिक्त ठरलेली पदे आपोआप व्यपगत होतील.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७०३/आपुक, दि.२६.१२.२०१८ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२८१७४२०७८७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila Devendra Chaudhari
Date: 2019.01.28 17:43:16 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४. मा.सभापती, विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई,
५. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा, विधान भवन, मुंबई,
७. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई,
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१४. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद तथा सदर अधिका-यांमार्फत सर्व शाळांचे मुख्याध्यापक,
१५. शिक्षण निरीक्षक (दक्षिण/पश्चिम/उत्तर), बृहन्मुंबई,
१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
१७. सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका, शिक्षण मंडळे,
१८. मुख्य अधिकारी, विदर्भ व मराठवाड्यातील सर्व नगरपालिका/नगरपरिषदा,
१९. सर्व शिक्षणाधिकारी, महानगरपालिका,
२०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
२१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
२२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
२४. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषदा,
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२६. सर्व अधिक्षक, वेतन पथक (माध्यमिक),
२७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८. निवड नस्ती (टीएनटी-२).